पदस्थापनेमध्ये सुधारणा करणेबाबत..
सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन (गट-अ).

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन आदेश क्रमांक पसंप्र-२०१८/प्र.क्र.२८७/पदुम-१**
५ वा मजला विस्तार, मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक :- २९ नोव्हेंबर-२०१८.

वाचा :- १. शासन आदेश क्रमांक पसंप्र-२०१५/प्र.क्र.११५/पदुम-१, दि. ३१, मे-२०१७,
२. शासन आदेश क्रमांक पसंप्र-२०१६/प्र.क्र.२९८/पदुम-१, दि. ३०, ऑक्टोंबर-२०१८.

**शासन आदेश** :-

डॉ. संजय पारडे, सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त कार्यालय, जि.अकोला यांची उक्त दि. ३१/५/२०१७ च्या आदेशान्वये सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालपसचि, चिखली, जि.बुलढाणा या पदावर बदलीने पदस्थापना करण्यात आली आहे. तथापी, डॉ. संजय पारडे यांना अद्यापपर्यन्त कार्यमुक्त करण्यात आले नाही. पशुधन विकास अधिकारी (गट-अ) या संवर्गातील ९१ अधिका-यांना सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन(गट-अ) या पदावर पदोन्नती व पदस्थापना देण्याबाबतचे आदेश दि.३०/१०/२०१८ रोजी निर्गमित करण्यात आले आहेत. सदर आदेशान्वये सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालपसचि, चिखली, जि.बुलढाणा व सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त कार्यालय, जि.अकोला या पदावर पदोन्नत अधिका-यांची नियुक्ती करण्यात आली आहे. त्यामुळे सध्यस्थितीत डॉ. पारडे यांना कोणत्याही पदावर पदस्थापना नसल्यामुळे त्यांना पदस्थापना देणे आवश्यक आहे. ही बाब विचारात घेता प्रशासकीय कारणास्तव तसेच सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने डॉ. संजय पारडे यांना सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त कार्यालय, जि.अकोला या पदावर दि. ३१/५/२०१९ पर्यन्त कार्यरत ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. डॉ. पारडे यांना वरील प्रमाणे सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त कार्यालय, जि.अकोला या पदावर दि. ३१/५/२०१९ पर्यन्त मुदतवाढ देण्यात आली असल्याने सदर पदावर दि.३०/१०/२०१८ च्या आदेशान्वये पदोन्नतीने नियुक्ती दिलेल्या डॉ. मनोहर रामचंद्र बोचे यांच्या पदस्थापनेमध्ये सुधारणा करणे आवश्यक आहे. ही बाब विचारात घेता सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने व प्रशासकीय कामकाजाच्या सोईच्या अनुषंगाने आता डॉ. मनोहर बोचे यांची सुधारीत पदस्थापना सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

३. डॉ. पारडे व डॉ. बोचे यांनी वरीलप्रमाणे सुधारीत पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे तसेच संबंधित नियंत्रण अधिकारी यांनी त्यांचा रुजू अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८११२९१५१६३८८३०१ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shri Ravindra Gurav

Digitally signed by Shri Ravindra Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, cn=Shri Ravindra Gurav
Date: 2018.11.29 15:20:16 +05'30'

(रविंद्र गुरव)
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य ,पुणे .
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला.

३. सहआयुक्त पशुसंवर्धन (मुख्यालय) औंध, पुणे
४. प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त, अमरावती.
५. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त कार्यालय, बुलढाणा/अकोला.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा/अकोला.
७. संबंधित अधिकारी (व्दारा -आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य ,पुणे)
८. कार्यासन पदुम-१ (निवड नस्ती).